**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्रमांक -: डीपीपी-११२१/प्र.क्र.२५५/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :-११ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९.०९.२०१८

२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.डीसीपीएस/२१४०/२०२१, दि.२२.११.२०२१ अन्वये सानुग्रह अनुदान मंजुरीचा सादर केलेला प्रस्ताव.

३) दिवंगत भालचंद्र सोविंदा सेलोकर, लिपिक-टंकलेखक यांचे नामनिर्देशित व्यक्ती / कायदेशीर वारसदार श्रीमती नलिनी भालचंद्र सेलोकर यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरिता प्राप्त झालेला दिनांक ०१.०६.२०२१ रोजीचा अर्ज.

## आदेश

उपरोक्त संदर्भ क्रमांक (२) अन्वये संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती नलिनी भालचंद्र सेलोकर यांच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक (३) येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.(१) येथील वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : अंनिया-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, दिवंगत भालचंद्र सोविंदा सेलोकर (मयत लिपिक-टंकलेखक) यांच्या नामनिर्देशित व्यक्तीस / कायदेशीर वारसास श्रीमती नलिनी भालचंद्र सेलोकर यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर "सानुग्रह अनुदान" शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दिनांक २३.०४.२०२१ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदरचा खर्च "मागणी क्र. जी-६, २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१- नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)- परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२२०२१११२४४४०३४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2022.02.11 12:45:38 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

२) संचालक,अभियोग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता कार्यालय, भंडारा

४) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा

५) श्रीमती नलिनी भालचंद्र सेलोकर, मु.पो.डोंगरगांव, ता. मोहाडी, जि. भंडारा

६) निवड नस्ती (पोल-१०)